प्रकल्पग्रस्तांना शासकीय / निमशासकीय सेवेत गट-क व गट-ड मधील
पदांवर नियुक्ती देतांना उच्चतम वयोमर्यादा शिथिल करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय, क्रमांक : विसआ-१००१/६०/प्र.क्र.१३२/०१(भाग-१)/१६-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० मे, २००३

संदर्भ :- १) सा.प्र.वि.शा.नि.,क्र.एसआरव्ही-१०७८/पीएपी/१९, दि. २५/९/१९७८.
२) सा.प्र.वि.शा.नि, क्र.एईएम-१०८०/३५/१६-अ, दि. २१/१/१९८०.
३) सा.प्र.वि.शा.नि, क्र.एसआरव्ही-१०९४/१००४/प्र.क्र.३०/१६-अ,दि. १७/११/९५.
४) सा.प्र.वि.शा.नि, क्र.एईएम-१०९९/प्र.क्र.४७/९९/१६-अ, दि. २५/२/२०००.

**शासन निर्णय :-**

प्रकल्पग्रस्त किंवा त्यांच्या कुटुंबातील व्यक्ती यांना बृहन्मुंबई बाहेरील शासकीय व निमशासकीय सेवांमधील गट-क (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) व गट-ड मधील पदांवर नियुक्त्या देताना संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये उच्चतम वयोमर्यादा तीन वर्षांनी शिथिल करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये बृहन्मुंबईतील शासकीय व निमशासकीय कार्यालयातील गट-ड मधील पदांवरील प्रकल्पग्रस्तांच्या नियुक्त्यांसाठीही ही सवलत देण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये प्रकल्पग्रस्तांना शासकीय व निमशासकीय सेवांमध्ये नियुक्त्या देण्यासाठी एकूण संवर्ग संख्येच्या ५% पदांवर सर्वोच्च प्राधान्य देण्यात आले असून संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये प्रकल्पग्रस्तांसाठी असलेल्या सर्वोच्च प्राधान्यक्रमात भूकंपग्रस्तांचाही समावेश करण्यात आला आहे.

२. प्रकल्पग्रस्तांना नियुक्त्यांच्या वेळी उच्चतम वयोमर्यादेत देण्यात आलेल्या शिथिलतेमध्ये वाढ करण्याच्या मागण्या तसेच विधीमंडळाच्या सन २००१ मधील दुसऱ्या अधिवेशनात विधानसभेत देण्यात आलेले आश्वासन यांचा विचार करून सदर वयोमर्यादा आणखी शिथिल करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

३. शासन असे आदेश देत आहे की, प्रकल्पग्रस्त किंवा त्यांच्या कुटुंबातील व्यक्ती यांच्या गट-क (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) व गट-ड मधील पदांवर नियुक्त्या करताना उच्चतम वयोमर्यादा खुल्या प्रवर्गासाठी ३५ वर्षापर्यंत व मागासवर्गीयांसाठी ४० वर्षापर्यंत शिथिल करण्यात यावी.

४. हे आदेश शासकीय सेवा, शासकीय मंडळे, महामंडळे, महानगर पालिका, नगर पालिका, जिल्हा परिषदा आणि ज्यांना मार्गदर्शक आदेश देण्याचा अधिकार राज्य शासनाला आहे, अशी इतर प्राधिकरणे, सेवा व संस्था यामधील नियुक्त्यांसाठी लागू राहतील.

५. हे आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(दे.श्रं. कुमावत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
४) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) मुख्य सचिव,
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
* ७) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* ८) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
* ९) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* १०) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
* ११) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* १२) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
* १३) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी / जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६) सर्व मंत्रालयीन विभाग,
१७) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख,
१८) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासन,
१९) निवड नस्ती.

* (पत्राने)

रोटा/एच-323(4500-6-03).